**नवीन शिक्षण आयुक्तालय बांधकामास निधी वितरणाकरिता नियंत्रक अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- प्रशामा-२०२१/प्र.क्र.८१/२१/प्रशा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२२.

वाचा -

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२४२१/(५४/२१)/अर्थसंकल्प, दिनांक २९.९.२०२१
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : प्रशामा-२०२१/प्र.क्र.८१/२१/प्रशा-५, दि.६/१२/२०२१
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : प्रशामा-२०२१/प्र.क्र.८१/२१/प्रशा-५, दि.३०/०३/२०२२
४) शिक्षण सहसंचालक, शिक्षण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. आशिका-२०२२/ भांबुर्डा बांधकाम/(आस्था-क-१४३)/१८६२/ दि.३१/०३/२०२२

**शासन निर्णय -**

संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये नवीन शिक्षण आयुक्तालय बांधकामाकरिता रुपये ८८.३४ कोटी इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये रु. १०.०० कोटी (रुपये दहा कोटी मात्र) इतका निधी, “मागणी क्र.ई-४, ४२०२ शिक्षण, क्रीडा कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०२ माध्यमिक शिक्षण (००)(०४) उपसंचालक व शिक्षण विभागाच्या कार्यालय इमारतीचे बांधकाम (कार्यक्रम) ५३, मोठी बांधकामे (४२०२६२२८)” या लेखाशिर्षांतर्गत आयुक्त (शिक्षण) कार्यालयास वितरीत करण्यात आला आहे. आयुक्त (शिक्षण) कार्यालयाने याप्रकरणी नियंत्रक अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी नियुक्त करण्याबाबत संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये शासनास विनंती केली आहे. त्यास अनुसरुन नवीन शिक्षण आयुक्तालय बांधकामाकरिता निधी वितरण करण्याकरिता आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी व सहाय्यक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११३१७४८१२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH
BASAVESHWAR
MAMADAPURE

Digitally signed by SANTOSH BASAVESHWAR MAMADAPURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfe111652996d95372924b1d22cdf88b33dfa2a3de3d8ea011b7d83adc40cb6, pseudonym=EB81C64443B702FB77DC1591B2143DFF0994DDB2, serialNumber=557ABE7A7194EC5DDC74DF537D7D57A9DBDA20B1937A2E41983C35F6A38B6AD8, cn=SANTOSH BASAVESHWAR MAMADAPURE
Date: 2022.03.31 14:20:09 +05'30'

**( सं. ब. ममदापुरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे
२. आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा), मुंबई
४. सर्व शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. उपसचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सहसंचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०.निवडनस्ती (प्रशा-५).